**श्री. नलिन मजिठिया, तत्कालीन अध्यक्ष, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच यांना वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. न्यायाप्र २०१८/प्र.क्र.४९/ग्रासं-४**
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २२ ऑक्टोबर, २०२१.

**संदर्भ:** (१) समक्रमांक शासन निर्णय , दि.३०.०६.२०१८.
(२) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.राआ/महा/आस्था-५/ मजिठिया /२०२०/२०२२, दि.०२.११.२०२०.
(३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. जा.क्र.राआ/आस्था-५/संकीर्ण/ २०२१/२२८१, दि.१०.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.१२१३/२०१७ व १०१०५ (s)/२०१८ या प्रकरणांच्या अनुषंगाने शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णय दि.३०.०६.२०१८ नुसार जिल्हा मंचाच्या एकूण ७१ आजी /माजी अध्यक्षांना शेट्टी आयोग व पद्मनाभन समितीच्या शिफारशीच्या सुधारीत वेतन श्रेणीच्या फरकानुसार रु.२,८३,३६,४८२/- इतकी रक्कम अदा करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयानुसार श्री. मजिठिया यांना रु.१,८४,३५३/- इतकी फरकाची रक्कम अदा करण्यात आलेली आहे.

२. सदर रक्कम श्री. मजिठिया यांनी दि.०९.१०.२००६ ते दि. ०८.१०.२०११ या दरम्यान जिल्हा मंच नागपूर व जिल्हा मंच मध्य मुंबई येथे केलेल्या कामाच्या अनुषंगाने यांना देण्यात आलेली आहे. तथापि, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या संदर्भाधीन दि.०२.११.२०२० च्या पत्रान्वये कळविले आहे की, श्री. मजिठिया यांची फरकाची एकूण देय रक्कम रु. ४,०९,१९५ /- इतकी असून याबाबत शासनास यापूर्वी कळविण्यात न आल्याने त्यांना रु.२,२४,८४२/- इतकी उर्वरित रक्कम अदा करणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

श्री. नलिन मजिठिया, माजी अध्यक्ष, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच यांना देय असलेली रु. २,२४,८४२/- (अक्षरी दोन लाख चोवीस हजार आठशे बेचाळीस फक्त ) इतकी फरकाची रक्कम चालू आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च, मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८, अन्न साठवण व वखार साठवण, (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना (०४)

(०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१), १०, कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२१-२२ करिता करण्यात आलेल्या अनुदानतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२१५४५३०१५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Katikar Padmavati

Digitally signed by Katikar Padmavati
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a8ad7b53d0557c046089b7688f952dd3fa64ce328691d88242bbde043cba86c, serialNumber=ec2d6c76e02d91ee9f71efe012213ab98a56fdcc6bffb5ce4ef3fafa682eb741, cn=Katikar Padmavati
Date: 2021.10.22 15:47:42 +05'30'

**( प. न. काटीकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
२. महालेखापाल महाराष्ट्र -१/२, (लेखा व लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
४. सह सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
५. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
६. प्रबंधक (प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
७. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नागपूर / मध्य मुंबई
८. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
९. कक्ष अधिकारी (विनियम) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती /ग्रासं -४.